**भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम २८-अ खालील वाढीव मोबदला रक्कम अदा करणेबाबत.**
**सीमा तपासणी नाका, वरुड, जि.अमरावती.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०११९/प्र.क्र.२६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १४ मार्च, २०२२.

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५.
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४१/भाग-१/अ-४, दि.३०.११.२०१६ व समक्रमांकाचे शासन शुद्धीपत्रक दि.२३.०२.२०१७.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
४) मा. सहदिवाणी न्यायालय (व.स्त.), अमरावती यांचेकडील भुसंदर्भ क्र.९७/२०११, दि.१८.१२.२०१७, चे न्यायालयीन आदेश.
५) गृह विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक १८.०६.२०१९.
६) उपजिल्हाधिकारी (भुसंपादन) अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती यांचे पत्र क्र.अका/विभूसं/ कावि-२८४ व २८३/ २०२१, दिनांक १९.०४.२०२१.
७) परिवहन आयुक्त, मुंबई यांचे पत्र क्र. प.आ/का-२ अ/सीतना-आधु/प्र.क्र.४५ -१२१७ /२०१९/ जा.क्र.११६४०, दिनांक १६.०९.२०२१ व जा.क्र. ८१४, दिनांक २०.०१.२०२२.

प्रस्तावना :-

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका, रवाळा, ता.वरुड, जि. अमरावती या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात उपर्निर्दिष्ट क्र.४ येथील न्याय निवाड्यानुसार भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम २८-अ अंतर्गत अंतिम निवाड्यानुसार वाढीव मोबदल्याची रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

उपर्निर्दिष्ट क्र. ७ येथील पत्रान्वये कळविल्यानुसार परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या संपादक संस्थेच्या सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका रवाळा, ता. वरुड, जि. अमरावती या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात उपर्निर्दिष्ट क्र. ४ अन्वये भूसंदर्भ क्र.९७/२०११ संदर्भात मा.दिवाणी न्यायालय (वरिष्ठस्तर), अमरावती यांनी दिलेल्या न्यायनिवाड्यानुसार वाढीव मोबदल्याची उपर्निर्दिष्ट क्र.६ येथील पत्रान्वये उप

जिल्हाधिकारी, भूसंपादन (अ.व प्र.) जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती यांनी परिगणित केलेली देय रक्कम एकूण रु. ११,१६,६०१/- इतकी रक्कम सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** मधील नमूद भूधारकांना अदा करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची रक्कम पुढील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

अ) सदर प्रकरणात दाखल एलएसी क्र. ९७/२०११ मधील भूधारक श्रीमती गोटुबाई पुंडलिकराव चौधरी यांना मा. सह दिवाणी न्यायाधिश (व.स्तर), अमरावती यांनी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने कलम २८-अ अंतर्गत अर्ज दाखल करणारे भूधारकांना मूळ निवाड्याप्रमाणे देण्यात आलेली रक्कम वजा करुन वाढीव मोबदला रक्कम देण्यात येत आहे.

ब) सदर प्रकरणातील भूधारकाने कलम १८ अंतर्गत याच सर्व्हे नंबरसाठी दिवाणी न्यायालयात संदर्भ दाखल केला नाही. कलम २८-अ अंतर्गत प्रकरण दाखल केलेल्या भूधारकांना वाढीव मोबदला कलम १८ अंतर्गत मिळाल्याने निदर्शनास आल्यास शासनाची रक्कम नियमानुसार त्यांचे स्थावर व जंगम मालमत्तेची विल्हेवाट लावून वसूल करण्याचा अधिकार शासनास राहील असे प्रतिज्ञापत्र मोबदला अदा करतेवेळी भूधारकांकडून घेण्यात येईल.

क) उप सचिव, महसूल व वन विभाग यांचे पत्र क्र. ०६/२०१५/ प्र.क्र. ८२/अ-२, दिनांक २९.०८.२०१५ च्या अनुषंगाने संबंधित भूधारकांना मोबदला अदा करण्यापूर्वी देय रक्कमेएवढ्या रकमेची बँक गॅरेंटी संबंधित जमिन मालकाकडून घेण्यात येईल. तसेच, पैसे परत करण्याचे प्रतिज्ञापत्र संबंधित भूधारकाकडून घेण्यात येईल.

ड) सदर निधी अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर खर्च होणार नाही तसेच, वाढीव मोबदला फरकाची रक्कम अदा करण्यास विलंब होणार नाही याबाबतची दक्षता उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व प्र. लाभक्षेत्र क्र.२, अमरावती तसेच प्रादेशिक परिवहन अधिकारी, अमरावती यांची राहील.

३. याकरीता उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर जिल्हाधिकारी, अमरावती यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या बाबीसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र. मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (०१)(०५) सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण व संगणकीकरण (२०४१ ०३१२) १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. परिवहन आयुक्त, मुंबई यांनी वरील लेखाशिर्षांतर्गत त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीपैकी परिशिष्ट-अ मधील नमूद रक्कम उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती यांना बीडीएस प्रणालीवर तात्काळ वर्ग करावी.

६. उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती यांनी या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही वादी/ खातेदारास उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती व न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यानी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५ अन्वये तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१४१२३५०४१२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: CN = LANGHI BHARAT R, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPARTMENT
Date: 2022.03.14 13:06:51 +05'30'

**(भ. रा. लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) विभागीय आयुक्त, अमरावती.
५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, अमरावती.
७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
८) सह सचिव,(भूसंपादन) महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती.
१०) प्रादेशिक परिवहन अधिकारी , अमरावती.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
१२) जिल्हा सरकारी वकील, अमरावती.
१३) महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१४) महालेखापाल-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१५) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) वित्त विभाग (अर्थसंकल्प शाखा-१२/व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती (परिवहन-४).

# परिशिष्ट-अ

## भूसंपादन प्रकरण क्र. १३/४७/२००७-२००८ मौजा रवाळा, ता. वरुड, जि. अमरावती

### कलम २८-अ अंतर्गत एलएसी क्र. ९७/२०११ वाढीव मोबदला बाबतचे प्रपत्र निवाडा पारित दिनांक १९.०३.२०२१

| कलम २८-अ खाली अर्ज दाखल केलेल्या भूधारकांचे नाव | सर्व्हे नं. | संपादित क्षेत्र हेक्टर आर | विभूस अ यांनी दिलेला जमिनीचा दर हेक्टर | जमिनीचे मूल्य | विभूसअ यांनी झाडाची दिलेली एकूण देय रक्कम | एकुण जमिनीचे मूल्य | दिलासा रक्कम ३०% दराने | अतिरिक्त घटकाची रक्कम १२% दराने दिनांक ०५.०६.०८ ते ०६.०१.१० (१९ महिने) | एकूण मोबदला (८+९+१०) | दिवाणी न्यायाल याचा संदर्भ क्र. | न्यायाल याचे आदेशा प्रमाणे दर हेक्टरी किंमत | जमिनीचा मोबदला रक्कम (१३*४) | न्यायालयाचे आदेशाप्रमाणे प्रति झाडांचे वयोमानानुसार मुल्य १) १० वर्ष रु.५४००/- र) ५ वर्ष रु.४७००/- | | न्यायाल याचे आदेशा नुसार एकूण मोबदला रक्कम (१४+१७) | ३०% दिलासा रक्कम (१७*३० %) | अतिरिक्त घटकाची रक्कम १२% दराने (दिनांक ०५.०६.०८ ते ०६.०१.१०) ५०८ दिवस (१९ महिने) | एकूण रक्कम (१७+१८ +१९) | विभूसंअ व न्यायाल याचे आदेशा प्रमाणे फरकाची रक्कम (१९-११) | ९% दराने व्याजाची रक्कम दिनांक ०७.०१.१० ते | कलम ३४ प्रमाणे व्याजाची रक्कम १५% दि. ०७.०१.११ ते १९.०४.२१ एकूण ३७५५ दिवस | एकूण देय रक्कम (१८+ १९+ २०) (रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | | | | | फळ झाडांची संख्या | वयानुसार मुख्य रुपये | | | | | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ |
| श्री. निळकंठ जगन्नाथ मेंढे | ६४/१-अ | ०.०६ | ० | ० | १०११४१ | १०११४१ | ३०३४२ | १९२१७ | १५०७०० | ९७/११ | ३२०००० | १९२०० | २७ | १४५८०० | १६५००० | ४९५०० | ३१४६३ | २४५९६३ | ९५२६३ | ८५७४ | १४७००५ | २५०८४२ |
| श्री. विजय पुंडलीक चौधरी | ६२/२ | ०.०४ | ० | ० | ३७८०६ | ३७८०६ | ११३४२ | ७१८३ | ५६३३१ | ९७/११ | ३२०००० | १२८०० | ९ | ४८६०० | ६१४०० | १८४२० | ११७०८ | ९१५२८ | ३५१९७ | ३१६८ | ५४३१४ | ९२६७९ |
| | ६२/४-अ | ०.०३ | ० | ० | १२६७५ | १२६७५ | ३८०३ | २४०८ | १८८८६ | ९७/११ | ३२०००० | ९६०० | ३ | १६२०० | २५८०० | ७७४० | ४९२० | ३८४६० | १९५७४ | १७६२ | ३०२०६ | ५१५४१ |
| श्री. विजय रामकृष्ण गोरडे | ५७/१-अ | ०.०४ | ० | ० | ६९२१२ | ६९२१२ | २०७६४ | १३१५० | १०३१२६ | ९७/११ | ३२०००० | १२८०० | १५ | ८१००० | ९३८०० | २८१४० | १७८८६ | १३९८२६ | ३६७०० | ३३०३ | ५६६३४ | ९६६३८ |
| श्रीमती गोटूबाई पुंडलीकराव चौधरी | ६२/४ | ०.०७ | ० | ० | १२७६७५ | १२७६७५ | ३८३०३ | २४२५८ | १९०२३६ | ९७/११ | ३२०००० | २२४०० | ३३ | १७८२०० | २००६०० | ६०१८० | ३८२५१ | २९९०३१ | १०८७९६ | ९७९२ | १६७८८८ | २८६४७५ |
| श्री. प्रकाश महादेवराव गाणोरकर व इतर | ५७/१-ब | ०.०४ | ० | ० | १९०१५ | १९०१५ | ५७०५ | ३६१३ | २८३३२ | ९७/११ | ३२०००० | १२८०० | ६ | २८२०० | ४१००० | १२३०० | ७८१८ | ६१११८ | ३२७८६ | २९५१ | ५०५९३ | ८६३३० |
| श्री. विठ्ठल सखाराम गोरडे, श्री.गजानन रामकृष्ण गोरडे, श्री. विजय रामकृष्ण गोरडे सौ. निरंजना शरद गणोरकर, सौ.सुशीला सुधाकर बोराडे, कु. बसंती | ५७/१ | ०.०५ | ० | ० | ८६०२४ | ८६०२४ | २५८०७ | १६३४५ | १२८१७६ | ९७/११ | ३२०००० | १६००० | १५ | ८१००० | ९७००० | २९१०० | १८४९६ | १४४५९६ | १६४२१ | १४७८ | २५३४० | ४३२३८ |

| | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रामकृष्ण गोरडे, सौ. अनिता ज्ञानेश्वर काळे, कु. सुनिता रामकृष्ण गोरडे | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
| श्री. पुंडलिक गोविंद तिजारे | ५५/३ | ०.१३ | १६०००० | २०८०० | ० | २०८०० | ६२४० | ३९५२ | ३०९९२ | ९७/११ | ३२०००० | ४१६०० | ६ | ३२४०० | ७४००० | २२२०० | १४१११ | ११०३११ | ७९३१९ | ७१३९ | १२२४०१ | २०८८५८ |
| एकूण | | ०.४६ | १६०००० | २०८०० | ४५३५४८ | ४७४३४८ | १४२३०४ | ९०१२६ | ७०६७७९ | | | १४७२०० | ११४ | ६११४०० | ७५८६०० | २२७५८० | १४४६५४ | ११३०८३४ | ४२४०५५ | ३८१६५ | ६५४३८१ | १११६६०१ |